# महाराष्ट्र शासन

**क्रमांकः भाप्रसे १०१४/प्र.क्र. २१२/२०१४/९**
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१ ऑगस्ट, २०१४

<u>वाचा -</u>

**१) शासन अधिसूचना, साप्रवि, क्रमांकः एसआरव्ही २००४/प्र.क्र. १५/०४/१२, दि. २५.५.२००६**
**२) कार्यालयीन आदेश, साप्रवि, क्रमांकः भाप्रसे १०१०/प्र.क्र. २०८/२०१०/नऊ, दि. २१.८.२०१०**
**३) शासन अधिसूचना, साप्रवि, क्रमांकः पीओडी १००७/प्र.क्र. ९/१८, (र. व का.),दि. १४.११.२०१३**

# कार्यालयीन आदेश

'महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५' व 'शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३' अधिसूचित करण्यात आले आहेत. सदर नियमातील तरतुदींनुसार विभागाशी/कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्यासाठी अधिकाऱ्यांचे ३ स्तर निर्धारीत करण्याचे निदेश देण्यात आलेले आहेत. त्या अनुषंगाने कार्यासन क्रमांक ९ शी संबंधित विषयांवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्यासाठी अधिकाऱ्यांचे सुधारित ३ स्तर सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरण परत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

संदर्भाधीन क्रमांक २ येथे नमुद केलेला दि. २१.८.२०१० चे कार्यालयीन आदेश या आदेशान्वये अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११९३४४७९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMARANIKAR SUBHASH H

Digitally signed by UMARANIKAR SUBHASH H
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=UMARANIKAR SUBHASH H
Date: 2014.08.21 14:42:14 +05'30'

**सु. ह. उमराणीकर**
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्य सचिवांचे यांचे स्वीय सहायक,

३. प्रधान सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक,
४. सह सचिव (कार्यासन ९) यांचे स्वीय सहायक,
५. उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
६. उप सचिव (कार्यासन १२ व १८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
७. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
८. निवड नस्ती.

**कार्यालयीन आदेश क्रमांकः भाप्रसे १०१४/प्र.क्र. २१२/२०१४/९, दि. २१.८.२०१४ सोबतचे विवरणपत्र**

'महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५' व 'शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३' मधील तरतुदींनुसार कार्यासन ९ शी संबंधित विषयांवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टिने प्रकरणे सादर करण्यासाठी अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारीत करणे

| अ.क्र. | विषय | स्तर | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय/अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश/प्रमाणपत्र /पत्र निर्गमित करण्यास सक्षम अधिकारी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १) | महाराष्ट्र शासनात कार्यरत असलेल्या भाप्रसे अधिकाऱ्यांच्या स्थावर व जंगम मालमत्तेच्या व्यवहारांची नोंद घेणे / परवांनगी घेणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | कक्ष अधिकारी |
| २) | भाप्रसे अधिकाऱ्यांना पुरस्कार / सत्कार स्वीकारण्यास परवांनगी देणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ३) | भाप्रसे अधिकाऱ्यांना खाजगी संस्थेचे / मंडळाचे सदस्यत्व स्वीकरण्यास परवानगी देणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ४) | भाप्रसे अधिकाऱ्यांना अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी परवानगी देणे | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | कक्ष अधिकारी |
| ५) | भाप्रसे अधिकाऱ्यांना खाजगीरीत्या परदेशी जाण्यास परवानगी देणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ६) | भाप्रसे अधिकाऱ्यांना पुस्तक प्रकाशनास परवानगी देणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ७) | भाप्रसे अधिकाऱ्यांच्या कुटुंबियांना खाजगी कंपनीत नोकरी स्वीकारण्यास परवानगी देणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ८) | भाप्रसे अधिकाऱ्यांनी सार्वजनिक संस्था किंवा खाजगी व्यक्ती यांच्यासाठी केलेल्या कामापित्यर्थ मानधन/फी स्वीकरण्यास परवानगी देणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव/मा. मुख्य सचिव | अवर सचिव |
| ९) | भाप्रसे अधिकाऱ्यांनी धारण केलेल्या अतिरिक्त कार्यभाराचे विशेष वेतन मंजूर करणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| १०) | संवर्गातील पदाला संलग्न असलेले विशेष वेतन अनुज्ञेय आहे किंवा नाही याचा निर्णय घेणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ११) | भाप्रसे अधिकाऱ्यांना महागाई भत्ता मंजूर करणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १२) | घरभाडे भत्ता, वाहतूक भत्ता व स्थानिक पुरक भत्ता महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांना लागू करणे. (वित्त विभागाच्या सहमतीनंतर) | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| १३) | भाप्रसे अधिकाऱ्यांना नैमित्तिक रजेच्या कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूरीचे आदेश निर्गमित करणे (मा. मुख्य सचिव मंजूरी प्राधिकारी असलेल्या प्रकरणी, मा. मुख्य सचिवांच्या मंजूरीनंतर) | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| १४) | नैमित्तिक रजेच्या कालावधीतील रजा प्रवास सवलतीस कार्योत्तर मंजूरी देणे (उपरोक्त १३ मधील प्रकरणे वगळून) | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| १५) | भाप्रसे अधिकाऱ्यांना घरबांधणी/सगंणक/मोटार कार अग्रिम मंजूर करणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| १६) | भाप्रसे अधिकाऱ्यांना घरबांधणी/सगंणक/मोटार कार अग्रिम यासंबंधीचे अर्थसंकल्पीय कामकाज मंजूर करणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| १७) | मंत्रालयीन प्रशासकिय विभागाकडून प्राप्त झालेल्या भाप्रसे अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती ठरविण्यासंदर्भात प्रस्तावास सहमती देणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| १८) | भाप्रसे अधिकाऱ्यांना भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा/ना परतावा रक्कम मंजूर करणे. (नियमामध्ये विहित केलेल्या मर्यादेत) | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| १९) | भाप्रसे अधिकाऱ्यांना भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा/ना परतावा रक्कम मंजूर करणे. (नियमामध्ये विहित केलेली मर्यादा शिथील करुन) | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| २०) | भाप्रसे अधिकाऱ्यांना सेवानिवृत्ती नंतर भविष्य निर्वाह निधीतील रक्कम अंतिमत: मंजूर करण्यासाठीचा प्रस्ताव महालेखापाल कार्यालयास पाठविणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| २१) | भाप्रसे अधिकाऱ्यांना केंद्र शासनाचे ओळखपत्र प्राप्त करुन देण्यासाठी प्रस्ताव महाराष्ट्र सदन यांना पाठविणे. | कक्ष अधिकारी | ------ | उप/सह सचिव | उप/सह सचिव |
| २२) | भाप्रसे अधिकाऱ्यांना राज्य शासनाचे ओळखपत्र देणे. | कक्ष अधिकारी | ----- | उप/सह सचिव | उप/सह सचिव |
| २३) | भाप्रसे अधिकाऱ्यांना पारपत्रासाठी नाहरकत प्रमाणपत्र देणे. | कक्ष अधिकारी | ------ | उप/सह सचिव/प्रधान सचिव | सह सचिव/प्रधान सचिव |
| २४) | भाप्रसे अधिकाऱ्यांच्या सेवानिवृत्ती वेतनादी लाभाचा प्रस्ताव अंतिम मंजूरीकरीता महालेखापाल कार्यालयास पाठविणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २५) | भाप्रसे अधिकाऱ्यांना सेवानिवृत्तीनंतर केंद्रीय गट विमा योजनेची रक्कम मंजूर करणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| २६) | भाप्रसे अधिकाऱ्यांना मराठी/हिंदी भाषा परिक्षेतून सूट देणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | ----- | कक्ष अधिकारी |
| २७) | भाप्रसे अधिकाऱ्यांना सेवानिवृत्तीनंतर वाणिज्यिक सेवा स्वीकारण्यास परवानगी देणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव/ मा. मुख्य सचिव/मा. मुख्यमंत्री | उप/सह सचिव |
| २८) | भाप्रसे अधिकाऱ्यांना पूर्वकालीन सेवा जोडून देणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| २९) | भाप्रसे अधिकाऱ्यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती देणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ३०) | भाप्रसे अधिकाऱ्यांना कुटुंब नियोजन भत्ता मंजूर करणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ३१) | भाप्रसे अधिकाऱ्यांनी घोषित केलेले स्वग्राम स्वीकृत करणे/ बदल स्वीकृत करणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | कक्ष अधिकारी |
| ३२) | मुंबईचे शेरीफ पदावरील नियुक्तीसाठीची प्रस्ताव समितीसमोर सादर करणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव/ मा. मुख्य सचिव/मा. मुख्यमंत्री | उप/सह सचिव |
| ३३) | मुंबईचे शेरीफ पदाचा अतिरीक्त कार्याभार सोपविणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव/ मा. मुख्य सचिव/मा. मुख्यमंत्री | प्रधान सचिव |
| ३४) | मुंबईचे शेरीफ पदासाठी प्राप्त झालेल्या अर्जांची छाननी करुन सबंधित मान्यवरांचा गुप्त पोलिस अहवाल मागविणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ३५) | केंद्र शासकीय गट विमा योजनेच्या वर्गणीची जमा रक्कम केंद्र शासनाकडे पाठविणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | उप/सह सचिव |
| ३६) | लोकलेखा समितीकडे सादर करावयाची स्प्ष्टीकरणात्कम ज्ञापने संमत करणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ३७) | आदर्शविषयक कामकाजांमध्ये इतर विभागांशी समन्वय साधणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ३८) | आदर्श चौकशी आयोगाने सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने संबंधित भाप्रसे अधिकाऱ्यांवर पुढील कार्यवाही करणे. | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | उप/सह सचिव |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३९) | आदर्श चौकशी आयोगाच्या अहवालाबाबत प्राप्त होणारे विधिमंडळ कामकाज | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ४०) | भाप्रसे अधिकाऱ्यांची वार्षिक मालमत्ता विवरणपत्रे जमा करुन केंद्रशासनाच्या सांकेतस्थळावर उपलब्ध करुन देणे. | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव/ मा. मुख्य सचिव | कक्ष अधिकारी |
| ४१) | भाप्रसे अधिकाऱ्यांची एका आठवडयाच्या सक्तीच्या प्रशिक्षणाची वार्षिक यादी तयार करणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | कक्ष अधिकारी |
| ४२) | भाप्रसे अधिकाऱ्यांना एक आठवडयाचा प्रशिक्षण तपशिल पाठविणे | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | कक्ष अधिकारी |
| ४३) | भाप्रसे अधिकाऱ्यांच्या एका आठवडयाच्या सक्तीच्या प्रशिक्षणातील परस्पर करावयाच्या नियमानुसार बदलांना मान्यता देणे | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| ४४) | भाप्रसे अधिकाऱ्यांच्या प्रस्तावित प्रशिक्षात बदल करण्यासंबंधीचे/पुढे ढकलण्यासंबंधीचे/गाळण्यासंबंधीचे प्रस्तावावर निर्णय घेणे | कक्ष अधिकारी | अवर सचिव | सह सचिव | अवर सचिव |
| ४५) | शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना देशांतर्गत विशेष प्रशिक्षणासाठी पाठविणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | कक्ष अधिकारी |
| ४६) | शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षणासाठी पाठविणेसंबंधीचे विहित निकष शिथील करणे. | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| ४७) | भाप्रसे अधिकाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना राज्यात कार्यान्वयीत करणे | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ४८) | नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजने अंतर्गत अर्थसंकल्पीय तरतूद करणे | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप/सह सचिव | अवर सचिव |
| ४९) | ४० वर्षे वयावरील भाप्रसे अधिकाऱ्यांच्या वैद्यकीय चाचण्या करुन घेणे व त्याच्या अहवालाची संकेतस्थळावर माहिती भरणे | अवर सचिव | उप/सह सचिव | प्रधान सचिव | अवर सचिव |
| ५०) | भाप्रसे अधिकाऱ्यांची ओळखपत्रे छापण्यासाठी आलेल्या खर्चाची देयके मंजूर करणे | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | कक्ष अधिकारी |
| ५१) | विधानमंडळाकडून प्राप्त होणारी भाप्रसे अधिकाऱ्यांविरुध्दची हक्कभंगाची प्रकरणे | कक्ष अधिकारी | उप/सह सचिव | प्रधान सचिव | उप/सह सचिव |

****************************